**ग्रामीण पायाभूत विकास निधी मालिका १७ अंतर्गत सार्वजनिक आरोग्य विभागाच्या ६६ प्राथमिक आरोग्य केंद्र बांधकाम प्रकल्प वगळण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नाबार्ड-२०११/प्र.क्र.२०/अर्थबळ,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीखः **२४ जुलै, २०१४.**

वाचा -

१) महाव्यवस्थापक, राष्ट्रीय कृषि व ग्रामीण विकास बँक, पुणे यांचे मंजूरी पत्र क्र.एनबी/ एसपीडी/ १०२४/१०५/आरआयडीएफ-XVII(महाराष्ट्र)/१२४पीएससी/२०११-१२, दिनांक १३/३/२०१२

**२) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांकः : नाबार्ड-२०११/प्र.क्र.२०/अर्थबळ,दिनांक २८/३/२०१२**

३) महाव्यवस्थापक, राष्ट्रीय कृषि व ग्रामीण विकास बँक, पुणे यांचे प्रकल्प वगळण्याबाबत क्र.एनबी/एसपीडी/एमआरओ/ १२९३/ आरआयडीएफ-१२१ (PHC) २०१४-१५ दि.७/५/२०१४ चे पत्र.

प्रस्तावना -

राष्ट्रीय कृषि व ग्रामीण विकास बँक (नाबार्ड) ने महाराष्ट्र शासनास ग्रामीण पायाभूत विकास निधी मालिका १७ अंतर्गत ६६ प्राथमिक आरोग्य केंद्र बांधकामास वरील वाचा येथील संदर्भ क्र.१ अन्वये मान्यता प्रदान केली असून सदर कर्ज घेण्यासाठी शासनाने उक्त वाचा संदर्भ क्र.२ अन्वये सहमती दर्शविलेली आहे. मालिका-१७ अंतर्गत नाबार्डकडून मंजूर करण्यात आलेली कामे वेळेत सुरु न झाल्याने ती वगळण्यात येऊन आरआयडीएफ मालिका -२० अंतर्गत नव्याने सुधारित अंदाजपत्रकाप्रमाणे व ग्रामीण आरोग्य केंद्रांचे बांधकामाचा सुधारित प्रस्ताव वेगळयाने सादर करण्यात येणार असल्याचे सार्वजनिक आरोग्य विभागाने कळविल्यानुसार नाबार्डने दिनांक १४/१/२०१३ च्या पत्रान्वये सदर कामे मालिका-१७ मधून वगळण्यास मान्यता दिलेली आहे. त्यास अनुसरुन सदर कामे शासन स्तरावरुन मालिका-१७ मधून वगळण्याबाबतची बाब विचाराधीन होती.

शासन निर्णय

ग्रामीण पायाभूत विकास निधी मालिका-१७ अंतर्गत सार्वजनिक आरोग्य विभागाचे ६६ प्राथमिक आरोग्य केंद्र बांधकाम प्रकल्प एकूण रु.९४.२४८० कोटी इतक्या रकमेचे मंजूर केलेल्या कर्जाअंतर्गत प्रकल्प कामे वेळेवर सुरु न झाल्याने सार्वजनिक आरोग्य विभागाची सदर कामे ग्रामीण पायाभूत विकास निधी मालिका-१७ मधून खालील बाबी अधीन वगळण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

१) सदर प्रकल्पावरील खर्चाचे कोणतेही प्रतिपूर्ती दावे यापुढे सहसंचालक लेखा व कोषागारे, पुणे/ नाबार्डला सादर न करण्याची जबाबदारी सार्वजनिक आरोग्य विभागाची राहिल.

२) या प्रकल्पांसंदर्भात नाबार्डकडून प्राप्त झालेले परिचालिन अग्रीम/ प्रतिपूर्ती दाव्याच्या स्वरुपातील नाबार्ड कर्ज विहित दिनाकांस नाबार्डला प्रदान होण्याच्या दृष्टीने सहसंचालक, ले व को, पुणे विभाग, पुणे यांनी संनियंत्रण ठेवावे

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७२४१२१२२०३२०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subhash Narayan Gangurde

Digitally signed by Subhash Narayan Gangurde
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subhash Narayan Gangurde
Date: 2014.07.24 12:12:40 +05'30'

**( सुभाष गांगुर्डे )**
**कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल (लेखा परीक्षा) - महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५. अपर मुख्य सचिव नियोजन विभाग , मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
६. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग,१० वा मजला, संकुल इमारत, जी.टी.रुग्णालय आवार, मुंबई-४०० ००१.
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई-४०० ०२१,
८. सह संचालक, लेखा व कोषागारे (संगणक कक्ष)/नवीन प्रशासन भवन, मुंबई-४०० ०३२,
९. सह संचालक, लेखा व कोषागारे, पुणे विभाग, पुणे.
१०. डेप्युटी जनरल मॅनेजर, राष्ट्रीय कृषि आणि ग्रामीण विकास बँक (नाबार्ड), ५४, वेलस्ली रोड, पोस्ट बॅग नं.५ शिवाजी नगर, पुणे-११,
११. समन्वय अधिकारी, ग्रापाविनि प्रकल्प तथा सहसंचालक (रुग्णालय-जिल्हास्तर), आरोग्य सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२. कोषागार अधिकारी, पुणे,
१३. कार्यासन व्यय-१३, अर्थसंकल्प-१२, अर्थसंकल्प-९, प्रशासन-४, ऋण व हमी संनियंत्रण कक्ष, मंत्रालय,मुंबई-३२,
१४. निवड नस्ती, कार्यासन अर्थबळ.